# पोलीस उपनिरीक्षक (पूर्व) परीक्षा योजना व अभ्यासक्रम

## परीक्षा योजना :-

## प्रश्नपत्रिका - एक. प्रश्नपत्रिकेचा तपशील खालीलप्रमाणे:-

| विषय व संकेतांक | प्रश्नसंख्या | एकुण गुण | दर्जा | माध्यम | परीक्षेचा कालावधी | प्रश्नपत्रिकेचे स्वरुप |
|---|---|---|---|---|---|---|
| सामान्य क्षमता चाचणी (संकेतांक क्र.012) | 100 | 100 | पदवी | मराठी व इंग्रजी | एक तास | वस्तुनिष्ठ |

**अभ्यासक्रम :-**

सामान्य क्षमता चाचणी : - ( **विषय संकेतांक** - 012) या विषयामध्ये खालील घटक /उपघटकांचा समावेश असेल.

1) चालू घडामोडी - जागतिक तसेच भारतातील

2) नागरिकशास्त्र - भारताच्या घटनेचा प्राथमिक अभ्यास, राज्य व्यवस्थापन (प्रशासन) ग्राम व्यवस्थापन (प्रशासन)

3) आधुनिक भारताचा विशेषत: महाराष्ट्राचा इतिहास

4) भूगोल (महाराष्ट्राच्या भूगोलाच्या विशेष अभ्यासासह) - पृथ्वी, जगातील विभाग, हवामान, अक्षांश-रेखांश, महाराष्ट्रातील जमिनीचे प्रकार, पर्जन्यमान, प्रमुख पिके, शहरे, नद्या, उद्योगधंदे, इत्यादी.

5) अर्थव्यवस्था -
भारतीय अर्थव्यवस्था - राष्ट्रीय उत्पन्न, शेती, उद्योग, परकीय व्यापार, बँकिंग, लोकसंख्या, दारिद्रय व बेरोजगारी, मुद्रा आणि राजकोषीय नीति इत्यादी
शासकीय अर्थव्यवस्था - अर्थसंकल्प, लेखा, लेखापरीक्षण इत्यादी

6) सामान्य विज्ञान - भौतिकशास्त्र (फिजिक्स), रसायनशास्त्र (केमिस्ट्री), प्राणिशास्त्र (झूलॉजी), वनस्पतीशास्त्र (बॉटनी), आरोग्यशास्त्र (हायजीन)

7) बुध्दीमापन चाचणी व अंकगणित

# पोलीस उपनिरीक्षक, गट - ब (अराजपत्रित) मुख्य परीक्षा

## -: परीक्षा योजना :-

**प्रश्नपत्रिकेचे स्वरुप** - वस्तुनिष्ठ बहुपर्यायी **एकूण गुण** - 200

**प्रश्नपत्रिकांची संख्या - दोन. प्रत्येक प्रश्नपत्रिकेचा तपशील खालीलप्रमाणे**

| पेपर क्र. व संकेतांक | विषय | गुण | प्रश्नसंख्या | दर्जा | माध्यम | कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|
| 1<br>(संकेतांक 002) | मराठी व | 60 | 60 | मराठी - बारावी | मराठी | एक तास |
| | इंग्रजी | 40 | 40 | इंग्रजी - पदवी | इंग्रजी | |
| 2<br>(संकेतांक 025) | सामान्य ज्ञान, बुध्दिमापन व विषयाचे ज्ञान | 100 | 100 | पदवी | मराठी व इंग्रजी | एक तास |

## अभ्यासक्रम

**पेपर क्रमांक - 1 मराठी व इंग्रजी**

**मराठी :-** सर्वसामान्य शब्दसंग्रह, वाक्यरचना, व्याकरण, म्हणी व वाकप्रचार यांचा अर्थ आणि उपयोग तसेच उताऱ्यावरील प्रश्नांची उत्तरे

**इंग्रजी : -** Common Vocabulary, Sentence structure, Grammar, use of Idioms and phrases & their meaning and comprehension of passage.

**पेपर क्रमांक** - 2

सामान्य ज्ञान बुध्दिमापन व विषयाचे ज्ञान :- या विषयामध्ये खालील घटक/ उपघटकांचा समावेश असेल.

1 **चालु घडामोडी - जागतिक तसेच भारतातील**

2 **बुध्दिमत्ता चाचणी**

3 **महाराष्ट्राचा भूगोल** - महाराष्ट्राच्या रचनात्मक (Physical) भूगोल, मुख्य रचनात्मक (Physiographic) विभाग, Climate, पर्जन्यातील विभागावर बदल, नद्या, पर्वत, डोंगर, राजकीय विभाग, प्रशासकिय विभाग, नैसर्गिक संपत्ती - वने व खनिजे, मानवी व सामाजिक भूगोल - लोकसंख्या (Population), Migration of Population व त्याचे Source आणि Destination वरील परिणाम, ग्रामीण वस्त्या व तांडे, झोपडपट्टया व त्यांचे प्रश्न, संत गाडगे बाबा ग्राम स्वच्छता अभियान.

4 **महाराष्ट्राचा इतिहास** - सामाजिक व आर्थिक जागृती (1885- 1947), महत्वाच्या व्यक्तींचे काम, स्वातंत्र्यपूर्व भारतातील सामाजिक जागृतीतील वर्तमानपत्रे व शिक्षणाचा परिणाम/भाग, स्वातंत्र्यपूर्व काळातील इतर समकालीन चळवळी, राष्ट्रीय चळवळ.

5 **भारतीय राज्यघटना** - घटना कशी तयार झाली आणि घटनेच्या प्रस्तावनेमागची भूमिका व तत्वे, घटनेची महत्वाची कलमे/ठळक वैशिष्टये, केंद्र व राज्य संबंध, निधर्मी राज्य, मूलभूत हक्क व कर्तव्ये राज्याच्या धोरणाची मार्गदर्शक तत्वे-शिक्षण, युनिफॉर्म सिव्हील कोड, स्वतंत्र न्यायपालिका.

6 **माहिती अधिकार अधिनियम** - 2005

7 **संगणक व माहिती तंत्रज्ञान** - आधुनिक समाजातील संगणकाची भूमिका, वेगवेगळया क्षेत्रातील जीवनात संगणकाचा वापर, डाटा कम्युनिकेशन, नेटवर्कींग आणि वेब टेक्नॉलॉजी, सायबर गुन्हे व त्यावरील प्रतिबंध व या संबंधातील कायदे व केस स्टडीज (case law) नविन उद्योग म्हणून माहिती तंत्रज्ञानाचा निरनिराळया सेवा सुविधांची माहिती मिळण्यासाठी होणारा उपयोग, भारतातील माहिती तंत्रज्ञान उद्योगाची वाढ व त्याचा दर्जा, शासनाचे कार्यक्रम, जसे मिडीया लॅब एशिया, विद्या वाहिनी, ज्ञान वाहिनी, सामुहिक माहिती केंद्र इत्यादी.

8 **मानवी हक्क व जबाबदाऱ्या** - संकल्पना- आंतरराष्ट्रीय मानवी हक्क मानक, त्यासंदर्भातील भारतीय राज्यघटनेतील तरतूद, भारतातील मानवी हक्क व जबाबदा-या यंत्रणेची अंमलबजावणी व संरक्षण, भारतातील मानवी हक्क चळवळ, मानवी हक्कापासून वंचित राहण्याच्या समस्या, गरीबी, निरक्षरता, बेकारी, सामाजिक- सांस्कृतिक- धार्मिक प्रथा यासारख्या अडचणी, (हिंसाचार, भ्रष्टाचार, दहशतवाद, कामगारांचे शोषण, संरक्षित गुन्हेगारी, इत्यादी.) लोकशाही व्यवस्थेतील एकमेकांचे हक्क आणि मानवी प्रतिष्ठा व एकतेचा आदर करण्यासंबंधी प्रशिक्षणाची गरज व महत्व, नागरी हक्क संरक्षण अधिनियम 1955, मानवी हक्क संरक्षण अधिनियम 1993, कौटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे संरक्षण अधिनियम 2005, कौटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे सरक्षण नियम 2005, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती (अत्याचारास प्रतिबंध) अधिनियम 1989, हुंडाबंदी अधिनियम 1961, महात्मा गांधी तंटामुक्ती अभियान.

9 **मुंबई पोलीस कायदा**

10 **भारतीय दंड संहिता**

11 **फौजदारी प्रक्रीया संहिता** - 1973

12 **भारतीय पुरावा कायदा ( Indian Evidence Act. )**

*******